राज्यातील इतर मागासवर्गीय विद्यार्थ्यांसाठी
शालांत परिक्षोत्तर शिष्यवृत्ती देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग,**
शासन निर्णय क्रमांकःइमाव २००२/प्र.क्र. ४१४/मावक-३
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २९ मे, २००३

संदर्भः- १) शासन निर्णय शिक्षण व समाजकल्याण विभाग क्रमांकःबीसीपी-१०५९/इ, दिनांक २१ जानेवारी, १९६०
२) शासन निर्णय शिक्षण व समाजकल्याण विभाग क्रमांकःइबीसी-१०६६/ १४७८७-जे, दिनांक २९ ऑगस्ट, १९६६
३) शासन निर्णय शिक्षण व समाजकल्याण विभाग क्रमांकःइबीसी-१०५८/ ८३५६७-जे, दिनांक २४ डिसेंबर, १९७०
४) भारत सरकार कल्याण मंत्रालय, पत्र क्र.१२०११/२३/९७, बीसीसी, दि.६/१/१९९८.
५) भारत सरकार कल्याण मंत्रालय, पत्र क्र.११०१४/१३/९९, बीसीसी, दि.१६/१२/१९९९.
६) भारत सरकार कल्याण मंत्रालय, पत्र क्र.११०१४/१/२००१, दि.४/५/२००१.

**प्रस्तावना -** केंद्र शासनाने इतर मागासवर्गासाठी १०० टक्के केंद्र पुरस्कृत योजनेनुसार शालांत परिक्षोत्तर शिष्यवृत्ती योजना सन १९९८-९९ पासून लागू केली आहे. राज्यामध्ये सद्या अनुसूचित जाती, अनुसूचित जमातींना केंद्र शासनाच्या निकषानुसार १०० टक्के केद्र पुरस्कृत योजना म्हणून शालांत परिक्षोत्तर शिष्यवृत्ती योजना शासन निर्णय, शिक्षण व समाज कल्याण विभाग क्रमांक : बीसीसी १०५९/इ, दि.२१ जानेवारी, १९६० अन्वये लागू करण्यात आली आहे. राज्यात विमुक्त जाती, भटक्या जमाती असा स्वतंत्र मागासवर्ग निर्माण करण्यात आला आहे. या प्रवर्गासाठी राज्य शासनाद्वारे अनुसूचित जाती/ जमातीच्या धर्तीवर राज्य शासनाची शालांत परिक्षोत्तर शिष्यवृत्ती योजना लागू केली आहे. इतर मागासवर्गाच्या शालांत परीक्षोत्तर प्रस्तावावर विचार करीत असतांना राज्य शासनास असे दिसून आले की, राज्यातील अनुसूचित जाती/ जमाती, विमुक्त जाती, भटक्या जमाती व इतर मागासवर्ग यांना योग्य प्रकारे त्या त्या प्रवर्गात बसवून एकच न्याय देणे शक्य आहे. याबाबीचा विचार करुन राज्य शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-** राज्यातील अनुसूचित जाती, विमुक्त जाती, भटक्या जमाती (धनगर, वंजारीसह) व विशेष मागास प्रवर्गाच्या विद्यार्थ्यांसाठी असलेली "शालांत परिक्षोत्तर शिष्यवृत्ती योजना" राज्यातील इतर मागासवर्गीय विद्यार्थ्यांना त्याच धर्तीवर २००३-२००४ या शैक्षणिक वर्षापासून लागू करण्यास व त्यासाठी येणाऱ्या रु.१२०.०० कोटी (रूपये एकशे वीस कोटी ) इतक्या वार्षिक आवर्ती खर्चास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. इतर मागासवर्गीयांसाठी लागू करण्यात यावयाच्या भारत सरकार मॅट्रीकोत्तर शिष्यवृत्ती या योजनेच्या अटी व शर्ती अनुसूचित जाती, विमुक्त जाती, भटक्या जमाती (धनगर, वंजारीसह) व विशेष मागास प्रवर्गासाठी असलेल्या अटी व शर्तीप्रमाणेच राहतील. तसेच उत्पन्नाची मर्यादा व शिष्यवृत्तीचे दरही त्याचप्रमाणे राहतील.

३. या बाबीवर होणारा खर्च "२२२५ अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग यांचे कल्याण, ०३-मागासवर्गीयांचे कल्याण, २७७, शिक्षण , पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - केंद्र पुरस्कृत योजना, (०२) (१४) इतर मागासवर्गीय विद्यार्थ्यांसाठी मॅट्रिकोत्तर शिष्यवृत्या (२२२५- ३१४ ४) ४० शिष्यवृत्त्या- मागणी क्रमांक एन-४ या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व या लेखाशिर्षाखाली त्या त्या वित्तीय वर्षाच्या मंजुर तरतूदीमधून त्या त्या वित्तीय वर्षात भागविण्यात यावा.

४.  हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक : ४२२/०३/व्यय-१४ , दिनांक ५/५/२००३, अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावांने,

वैअपारकर

**(वै.अ.पारकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रति,
मा.राज्यपालांचे सचिव,
मा.मुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
मा.उपमुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
मा.मंत्री (विजाभज) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
मा.मंत्री(समाजकल्याण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
मा.राज्यमंत्री (विजाभज) यांचे खाजगी सचिव , मंत्रालय, मुंबई,
मा.राज्यमंत्री(समाजकल्याण) यांचे खाजगी सचिव , मंत्रालय, मुंबई,
संचालक, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण संचालनालय, पुणे
संचालक, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
संचालक, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
संचालक, उच्च व तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
सर्व विभागीय समाज कल्याण अधिकारी
सर्व जिल्हाधिकारी
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, सर्व जिल्हा परिषदा
सर्व विशेष जिल्हा समाज कल्याण अधिकारी
सर्व जिल्हा समाज कल्याण अधिकारी सर्व जिल्हा परिषदा
महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता)१/२, मुंबई/ नागपूर
महालेखापाल, महाराष्ट्र (लेखापरिक्षा)१/२, मुंबई/ नागपूर
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई
सर्व मंत्रालयीन विभाग
सर्व मंत्रालयीन विभागाच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग/ कार्यालय प्रमुख.
वित्त विभाग- व्यय-१४, अर्थसंकल्प
नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व उप सचिव/ अवर सचिव/ कक्ष अधिकारी, सा.न्या., सां.का., क्री. व वि.स.विभाग,, मंत्रालय, मुंबई,

महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई (त्यांना विनंती की, यासाठी योग्य ती प्रसिध्दी द्यावी).
निवड नस्ती/ मावक-३.